**शासन निर्णय,परिपत्रक,शासन आदेश इ. शासनाच्या संकेतस्थळावर अपलोड करताना विभागांनी घ्यावयाची दक्षता.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
शासन परिपत्रक क्र: मातंसं २०१२/प्र.क्र.१४५/३९
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २ जून, २०१५.

<u>संदर्भ</u> - संसदीय कार्य विभागाची नस्ती क्र.विमंअ-२०१५/(१)/प्र.क्र.५०/पाच

**शासन परिपत्रक: -**

शासनाची ध्येय धोरणे निश्चित करण्यासाठी विभागांकडून वेळोवेळी शासन निर्णय,शासन परिपत्रके,शासन आदेश इत्यादी निर्गमित करण्यात येतात. सदर दस्तावेज शासनाच्या अधिकृत संकेतस्थळावर सुलभतेने उपलब्ध करुन देण्यासाठी अपलोडिंगची सुविधा माहिति तंत्रज्ञान संचालनालयाकडून दिली जात आहे.

२. विभागांकडून अंतिम करण्यात आलेले शासन निर्णय,परिपत्रके इत्यादी यांमधील मजकुराची सर्वस्वी जबाबदारी संबंधित विभागाची आहे.माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडून केवळ तांत्रिक सहकार्य केले जाते. मजकुरांतील बदल,भाषांतर इत्यादी बाबी काळजीपूर्वक तपासले आहेत याची खात्री करुनच विभागाने दस्तावेजांचे अपलोडींग करावे. शासन निर्णय /परिपत्रक इत्यादींच्या शीर्षकाच्या भाषांतरामध्ये तसेच शासन निर्णय /परिपत्रक यांच्या आशयामध्ये चूक आढळल्यास संबंधित विभागातील अधिकारी-कर्मचारी यांवर जबाबदारी निश्चित करून कारवाई करण्यात यावी. एकदा अपलोड केलेला शासन निर्णय/परिपत्रक यांमध्ये काही बदल करावयाचा असल्यास विभागाला अगोदरचा शासन निर्णय/परिपत्रक अधिक्रमित करुनच नव्याने सुधारित शासननिर्णय /परिपत्रक अपलोड करणे बंधनकारक राहील.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०६०२१५५९३९७८११ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nanda Maruti Raut

Digitally signed by Nanda Maruti Raut
DN: CN = Nanda Maruti Raut, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.06.02 17:41:38 +05'30'

( नं. मा. राऊत )
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. राज्यपालांचे सचिव,
२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. मंत्रालयीन सर्व विभाग,
४. अप्पर मुख्य सचिव (माहिती तंत्रज्ञान विभाग) यांचे स्वीय सहायक
५.माहिती तंत्रज्ञान विभाग,कार्यासन ३९ (निवड नस्ती)